**महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांच्यामार्फत राबविण्यात येणाऱ्या शैक्षणिक अभ्यासक्रमाबाबतच्या प्रसिध्दी माध्यम आराखडयास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०२४/(प्र.क्र.८३/२४)/तांशि-५.**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-२८.०८.२०२४

**वाचा :-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि.१९ जानेवारी, २०१६
३. शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि.१ डिसेंबर, २०१६.
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१२६/का-३४, दि.१३/०८/२०२१.
५. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. मरातंशिमं/का-५६/DGIPR/२०२४/५०४८, दिनांक १४.०८.२०२४.

**शासन निर्णय :-**

संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ यांचे दि.१४.०८.२०२४ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने नमुद करण्यात येते की, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळामार्फत राबविण्यात येत असलेल्या शैक्षणिक अभ्यासक्रमांबाबत शैक्षणिक वर्ष २०२४-२५ च्या पदविका प्रवेशवाढीकरीता विविध योजनांबाबत दर्शनी जाहिरात तयार करणे, वितरण करणे, मोहिम आखणे व अंमलबजावणी करणे यासाठीच्या प्रस्तावाच्या आधारे महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांच्या मार्फत तयार करण्यात आलेल्या माध्यम आराखडयास “माध्यम व आराखडा नियोजन” समितीने त्यांचे दिनांक ०६.०८.२०२४ रोजीच्या बैठकीमध्ये अंतिम स्वरुप दिले असून, त्याचा तपशिल खालीलप्रमाणे आहे. :-

| महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ - माध्यम आराखडा | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| क्र. | Media | मूळ दर. प्रक्रिया | वारंवारिता | संख्या दिवस | अंदाजित रक्कम | जीएसटी | एकूण अंदाजित रक्कम सर्व करांसहित |
| १. | सोशल मिडीया | विहित ई-निविदा प्रक्रियेव्दारे | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादित | ३० दिवस | ४०,००,००० | ७,२०,००० | ४७,२०,००० |
| २. | डिजीटल मिडीया | विहित ई-निविदा प्रक्रियेव्दारे | नमूद अंदाजित रकमेच्या | ३० दिवस | ४०,००,००० | ७,२०,००० | ४७,२०,००० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | मर्यादित | | | | |
| Total-B | | | | | ८०,००,००० | १४,४०,००० | ९४,४०,००० |
| १. | शा.नि. दि.१३.०८.२०२१ नुसार रू.५.०० कोटी इतक्यात रकमेपर्यंतच्या प्रसिद्धी आराखडयासाठी एकूण खर्चाच्या ४% (रू.२० लाख) आणि त्यापेक्षा प्रत्येक वाढीव रकमेसाठी २% खर्च, उर्वरीत रकमेवर (रू.५कोटी) वजा जाता) प्रमाणे | | माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाला येणारा कार्यालयीन उपकरणावरील खर्च, सॉफ्टवेअर, तात्पुरत्या मनुष्यबळावरील खर्च, वाहतूक खर्च, इतर किरकोळ खर्च | | ४,००,००० | - | ४,००,००० |
| Total Expenditure | | | | | ८४,००,००० | १४,४०,००० | ९८,४०,००० |

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१२६/का-३४, दि.१३/०८/२०२१ अन्वये शासकीय जाहिरात वितरण धोरणाची अंमलबजावणीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली असुन शासनाच्या सर्व महामंडळे/मंडळे/प्राधिकरणे यांना लागू करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामध्ये मुद्दा क्र.५ व ६ नुसार परिच्छेद-१ येथील तक्त्यात नमूद केल्यानुसार रु.९८,४०,०००/- इतक्या रकमेच्या माध्यम आराखडयास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांच्या स्वनिधीतून भागविण्यात यावा.

४. सदर मान्यता मा.महासंचालक, माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समिती यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या दिनांक ०६.०८.२०२४ च्या बैठकीच्या इतिवृत्ताचे काटेकोर पालन करण्याच्या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९४०/२०२४/व्यय-५,दि.२१.०८.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२८१४४८०५८२०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJAY VITTHAL KHARDE

Digitally signed by AJAY VITTHAL KHARDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=99f2d58601919f488f4e4b4238bd3f1def13cbf3ed7d870c3ce707f566424ec3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C51AE2EF70E8CB85FD2CAD9AA28A46DC972A1A9B3FEB81BAAB9A648B45BE1B24, cn=AJAY VITTHAL KHARDE
Date: 2024.08.28 15:03:35 +05'30'

**( अजय वि. खर्डे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री,उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. प्रधान सचिव ,उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

५. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,

६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/ नागपूर

७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांचेमार्फत)

९. निवडनस्ती (तांशि-५)